राज्य माहिती आयोगासाठी विधि कक्ष स्थापन करण्यासाठी पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१४/प्र.क्र.२२० /सहा,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दि.१९ जून, २०१७

**प्रस्तावनाः-**

राज्य माहिती आयोगाच्या दि.१३.३.२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये आयोगासाठी विधि कक्ष स्थापन करण्यानुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्याच्या सूचना मा.मुख्य सचिवांनी अतिरिक्त मुख्य सचिव (र व का) यांना दिल्या होत्या. त्यानुसार राज्य माहिती आयोगाच्या मुख्यालयाच्या स्तरावर एक अवर सचिव (विधि), एक विधि सहाय्यक व त्यांना सहाय्य करण्यासाठी एक लिपिक टंकलेखक अशी तीन पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव आयोगाने शासनास सादर केला होता. त्या अनुषंगाने उपरोक्त प्रस्ताव विचारात घेवून उच्चस्तरीय समितीने १९ मे, २०१७ रोजी झालेल्या बैठकीत, अवर सचिव (विधि) गट-अ व विधि सहाय्यक (गट-ब ) अराजपत्रित अशी दोन पदे नियमित स्वरुपात निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. तदनुषंगाने अवर सचिव (विधि) व विधी सहाय्यक ही पदे निर्माण करण्याकरिता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

राज्य माहिती आयोगाच्या आस्थापनेवर अवर सचिव(विधि) गट-अ व विधि सहाय्यक(अराजपत्रित )गट-ब ही दोन पदे नियमित स्वरुपात निर्माण करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| पद | पद संख्या | वेतन |
|---|---|---|
| अवर सचिव (विधि) गट अ | १ | १५६००-३९१०० + ग्रेड पे ६६०० |
| विधि सहाय्यक गट ब (अराजपत्रित) | १ | ९३००-३४८००+ ग्रेड पे ४४०० |

२. हा शासन निर्णय नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जिवन व पदांचे आढावे इ. प्रस्तावांची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.१९.०५.२०१७ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०६१९१५२०४६७७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shwetambari Pravin Khade

Digitally signed by Shwetambari Pravin Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d2e526f024133a519abcf2dbb6bd01281beb6bf02f01c42818d29e1399ab8446, cn=Shwetambari Pravin Khade
Date: 2017.06.19 15:17:55 +05'30'

**(श्वे.प्र.खडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. सर्व माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
४. सचिव राज्य माहिती आयोग,मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
७. निवडनस्ती कार्यासन सहा.